# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः स्वभामि-२०१५/प्रक्र.०५/पापु-०८

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१
दिनांक: १३ जानेवारी, २०१५.

**प्रस्तावना :**

ग्रामीण भागामध्ये प्रत्येक कुटूंबाकडे स्वच्छतेची पर्याप्त साधने उपलब्ध असावीत आणि गाव परिसर स्वच्छ रहावा यासाठी केंद्र व राज्य शासनाकडून केंद्रीय ग्रामीण स्वच्छता कार्यक्रम, संपूर्ण स्वच्छता अभियान व निर्मल भारत अभियान या सारख्या योजना आणि कार्यक्रमाच्या माध्यमातून प्रयत्न गेल्या काही दशकात केला गेला. स्वच्छता विषयक प्रश्नांचे व्यापक स्वरुप आणि त्या परिणामस्वरुप ग्रामीण क्षेत्रात निर्माण होत असलेल्या समस्या तातडीने सोडविण्याच्या उद्देशाने निर्मल भारत अभियानाची पुनर्रचना केली असुन देशात ऑक्टोबर, २०१४ पासुन स्वच्छ भारत मिशन सुरु करण्यात आले आहे. स्वच्छ भारत मिशनच्या मार्गदर्शक सुचनानूसार ग्रामीण भागातील संपूर्ण स्वच्छतेचे उद्दिष्ट महात्मा गांधी यांच्या १५० व्या जयंती दिनी म्हणजेच सन २०१९ अखेर पूर्ण करण्याचे निर्धारीत केले आहे. याचबरोबर गावपातळीवर सांडपाणी व घनकचरा व्यवस्थापन, गावस्वच्छता आणि पिण्याच्या पाण्याची व्यवस्था निर्माण करणे ही अपेक्षित आहे. स्वच्छ भारत मिशनच्या मार्गदर्शक सुचनेनुसार सदर उद्दिष्ट गाठण्यासाठी राज्य, जिल्हा, तालुका आणि ग्रामपंचायतस्तरावर अभियानाचे प्रभावी नियोजन, त्यानुसार त्याची अंमलबजावणी आणि निर्माण झालेल्या सुविधांची देखभाल दुरूस्ती इ. बाबींचा विचार होणे अभिप्रेत आहे. निर्मल गावांच्या निर्मितीस चालना मिळून गावपातळीवर निर्माण झालेल्या स्वच्छता सुविधांचा ग्रामस्थांना लाभ घेता यावा यास्तव केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनान्वये राज्यात, ग्रामीण पाणीपुरवठा व स्वच्छता विभागाने स्वच्छ भारत मिशनच्या अंमलबजावणीस सुरुवात केली आहे. शिवाय उपरोक्त मार्गदर्शक सुचनांच्या अधीन राहून स्वच्छता क्षेत्रातील इतर सर्व उपक्रम, योजना आणि कार्यक्रम राबविण्यास प्रारंभ केला आहे. या पार्श्वभूमीवर सदर अभियानाची / कार्यक्रमाची प्रभावी अंमलबजावणी करता यावी यासाठी युनिसेफ, मुंबई व पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, महाराष्ट्र शासन यांनी संयुक्तपणे सन २०१३-२०१४ मध्ये "समूदाय संचलित हागणदारी निर्मूलन कृती आराखडा-नियोजन प्रक्रिया" (Community led Open Defecation Elimination Plan-ODEP) हा नाविन्यपूर्ण उपक्रम चंद्रपूर आणि लातूर जिल्ह्यात प्रायोगिक तत्वावर राबवून सदर उपक्रमाच्या अंमलबजावणीस सुरुवात केली. या उपक्रमामुळे गावे निर्मल बनविण्यासाठीची नेमकी दिशा प्राप्त झाली आणि गाव हागणदारीमुक्त करण्याचे लक्षित उद्दिष्ट साध्य करण्यात चांगले यश प्राप्त झाले आहे. लातूर व चंद्रपूर जिल्ह्यात नियोजन प्रक्रियेमुळे प्राप्त झालेले यशाचा राज्यस्तरावर अभ्यास करून या धर्तीवर संपूर्ण राज्यात समुदाय संचलित हागणदारी निर्मूलन कृती आराखडा नियोजन प्रक्रिया आयोजित करण्याचे निश्चित करण्यात आले आहे. यानुषंगाने जिल्हास्तरावरील तज्ञांचे आणि तालूकास्तरावरील संसाधन गटांच्या निवडक प्रतिनिधींना या प्रक्रीयेसंबंधी राज्यस्तरावर सविस्तर प्रशिक्षण देण्यात आले. सध्या राज्यात प्रत्येक

जिल्ह्यात या प्रक्रीयेसंबंधी किमान चार तज्ञ साधन व्यक्ती उपलब्ध आहेत. या तज्ञ साधन व्यक्तींनी आपापल्या जिल्ह्यात गेल्या काही महिन्यात समूदाय संचलित हागणदारी निर्मूलन कृती आराखडा संकल्पना संबंधी जिल्हास्तर कार्यकर्त्यांसाठी प्रशिक्षण घेतले असुन त्या माध्यमातून ही प्रक्रीया राबविण्याचे कौशल्य असणाऱ्या ३० ते ४० साधन व्यक्तींचा समुह प्रत्येक जिल्ह्याकडे उपलब्ध आहे. समूदाय संचलित हागणदारी निर्मूलन कृती आराखड्यासंदर्भातील यशस्वी पुर्वानुभव, उपलब्ध तज्ञ मनुष्यबळ आणि केंद्र शासनाने निश्चित केलेले उद्दिष्ट सन,२०१९ अखेर पूर्ण करण्याच्या पार्श्वभुमीवर जिल्ह्याच्या वार्षिक अंमलबजावणी आराखड्याअंतर्गत समाविष्ट करण्यात येणाऱ्या सर्व गावांमध्ये "समूदाय संचलित हागणदारी निर्मूलन कृती आराखडा-नियोजन प्रक्रिया" आयोजित करण्याचे निश्चित करण्यात आले असून सदर नियोजन प्रक्रियेच्या आयोजनासाठी खालीलप्रमाणे शासन परिपत्रक निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन परिपत्रक :

जिल्ह्याच्या वार्षिक अंमलबजावणी आराखड्याअंतर्गत समाविष्ट करण्यात येणाऱ्या सर्व गावांमध्ये "समूदाय संचलित हागणदारी निर्मूलन कृती आराखडा-नियोजन प्रक्रिया" आयोजित करणे अनिवार्य असणार आहे. या प्रक्रियेमुळे गावे हागणदारीमुक्त करण्यासाठी, गावपातळीवर सांडपाणी व घनकचरा व्यवस्थापनासाठीच्या तसेच शालेय व संस्थास्तरावर पाणी आणि स्वच्छता सुविधा निर्माण करण्यासाठीच्या उपाययोजना निश्चित करून तयार झालेल्या कृती आराखड्याची अंमलबजावणी लोकसहभागातून होणे शक्य होणार आहे. तसेच सन,२०१९ अखेर संपूर्ण महाराष्ट्र निर्मल होण्यासाठीची नेमकी दिशा प्राप्त होणार आहे. यासाठी यापुढे स्वच्छ भारत मिशन जिल्हा वार्षिक कृती आराखड्यात समाविष्ट होत असलेल्या सर्व गावांचा समूदाय संचलित हागणदारी निर्मूलन कृती आराखडा तयार करणे बंधनकारक करण्यात येत आहे.

गावपातळीवर नियोजन प्रक्रियेच्या आयोजनासाठी व गावाचा हागणदारी निर्मूलनाचा कृती आराखडा तयार करण्यासाठीच्या मार्गदर्शक सुचना खालीलप्रमाणे राहतील.

### १. प्रक्रियेचा कालावधी आणि प्रक्रियेसाठीची कालमर्यादा

गावपातळीवर आयोजित करावयाच्या नियोजन प्रक्रिया आयोजनाचा कालावधी दोन ते तीन दिवसाचा राहील. सदर कालावधी हा ग्रामपंचायतींच्या कुटूंबसंख्येवर अवलंबून राहील. ज्या ग्रामपंचायतींची कुटूंबसंख्या २५० च्या आतील आहे अशा ग्रामपंचायतींमध्ये किमान दोन दिवस तर ज्या गावांची कुटूंबसंख्या २५० पेक्षा जास्त आहे अशा ग्रामपंचायतीमध्ये किमान ३ ते ४ दिवसाची नियोजन प्रक्रिया आयोजित करावी. या दोन/ तीन दिवसाच्या कालावधीत प्रशिक्षण पुस्तिकेत दिलेल्या साधनांची अंमलबजावणी करावी.

सदर नियोजन प्रक्रिया प्रत्येक वर्षी (सन २०१८ अखेर) प्रत्येक वर्षाच्या डिसेंबर ते फेब्रूवारी या तीन महिन्याच्या कालावधीत आयोजित करावी. जेणेकरून गाव कृती आराखड्यात प्रस्तावित करण्यात आलेल्या उपाययोजनांचा समावेश जिल्ह्याच्या वार्षीक अंमलबजावणीत करता येईल. सदर प्रक्रिया नियोजनबध्द होण्यासाठी जिल्हास्तरावर प्रक्रियेचे गावनिहाय वेळापत्रक तयार करून घ्यावे व त्यानुषंगाने संबंधित ग्रामपंचायतीस पूर्व सुचना निर्गमित करावी.

## २. प्रक्रियेच्या सुलभीकरणाची जबाबदारी

१. प्रत्यक्ष नियोजन प्रक्रियेच्या सुलभीकरणाची जबाबदारी तालूका संसाधन गटाची राहील. मात्र तालूका संसाधन गटास प्रक्रियेच्या सुलभीकरणासाठी आवश्यक असलेला निधी तत्परतेने उपलब्ध करून देण्याची जबाबदारी जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षाची राहील. वेळेत निधी उपलब्ध न झाल्यास होणाऱ्या दिरंगाईस जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्ष जबाबदार राहील.

२. ज्या ठिकाणी मुख्य संसाधन गट नियुक्त करण्यात आले आहेत अशा ठिकाणी नियोजन प्रक्रियेच्या सुलभीकरणाची जबाबदारी मुख्य संसाधन गटाची राहील. याचबरोबर सदर प्रक्रियेसाठी मुख्य संसाधन गटास आवश्यक असणारे सहकार्य तालूका संसाधन गट करेल.

३. ज्या ठिकाणी तालूका संसाधन गटातील समुह समन्वयक अथवा गट समन्वयकाची संख्या कमी असेल अशा ठिकाणी प्रक्रियेच्या सुलभकरणाची जबाबदारी मुख्य संसाधन केंद्रास अतिरीक्त जबाबदारी देण्यात यावी.

४. प्रक्रियेदरम्यान गावस्तरावरील सरपंच, ग्रामपंचायत सदस्य आणि क्षेत्रिय कर्मचारी, इ. चा सहभाग घेण्यासाठी तालूकास्तरावर संबंधित विभागास आवश्यक त्या सुचना निर्गमित कराव्यात.

**गावपातळीवर नियोजन प्रक्रियेसाठीच्या साधनांची अंमलबजावणी**

| १) | पहिला दिवस | दुसरा दिवस |
|---|---|---|
| सकाळी | **सत्र - १** | **सत्र -५** |
| | १.१ ग्रामस्थांसोबत प्राथमिक बैठक. | ५.१ स्वच्छताफेरी<br>५.२ पूर्ण झालेल्या प्रक्रियेचे नोंदणीकरण. |
| | **सत्र - २** | **सत्र -६** |
| | २.१ कुटूंबपातळीवर स्वच्छता सुविधांचे सहभागीय विश्लेषण. | ६.१ लक्षित गट चर्चा- संवाद आराखडा तयार करणे. |
| संध्याकाळी | **सत्र - ३** | **सत्र -७** |
| | ३.१ संस्थास्तरावरील स्वच्छता सुविधांची चाचपणी | ७.१ ग्रामस्तरीय हागणदारी निर्मूलन कृती आराखडा आणि संवाद आराखडा तयार करणे. (कच्चा मसूदा) |
| | **सत्र -४** | **सत्र -८** |
| | ४.१ पूर्ण झालेल्या प्रक्रियेचे नोंदीकरण. | ८.१ ग्रामसभेसाठीची तयारी- गावफेरी, कोपरा बैठका. |
| | ४.२ मशाल फ़ेरी / पाणी व स्वच्छतेशी संबंधीत चित्रफ़ितीचे (सिनेम) सादरीकरण. | ८.२ महिला ग्रामसभा व ग्रामसभेत कृती आराख़डयाचे वाचन करुन मंजूरी घेणे. |

**टिप - ज्या ग्रामपंचायतींची कुटूंबसंख्या २५० च्या आत आहे अशा ग्रामपंचायतीत वरील प्रमाणे दोन दिवसाची प्रक्रिया आयोजित करावी आणि २५० पेक्षा जास्त असलेल्या ग्रामपंचायतीमध्ये ३ ते ४ दिवसात सर्व साधनांची अंमलबजावणी करून गावाचा कृती आराखडा तयार करावा.**

वर नमुद केलेल्या तक्त्याप्रमाणे गावपातळीवर प्रक्रियेचे नियोजन करावे आणि सदर प्रक्रिया प्रभावी होण्यासाठी यापूर्वी निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक पुस्तिकेचा अवलंब करावा.




### २.१ ग्रामसभा मंजूरी

प्रक्रियेअंती गावपातळीवर ग्रामसभेचे आयोजन करावे व सदर आराखडा आणि स्वच्छता कामांचे अंदाजपत्रक प्रक्रियेच्या शेवटच्या दिवशी तयार करून त्यास ग्रामसभेची मंजूरी घ्यावी. ग्रामसभेच्या आयोजनासंबंधी सुचना निर्गमित करण्यासाठी प्रक्रियेपूर्वीच ग्रामसेवकास सुचना दयावी. कृती आराखडयास जर ग्रामसभेची मंजूरी मिळाली नसेल तर सदर आराखडा ग्राहय धरला जाणार नाही.

## ३. नियोजन प्रक्रियेच्या आयोजनासाठी निधीची तरतूद

१) नियोजन प्रक्रियेच्या आयोजनासाठी आवश्यक असलेल्या निधीची तरतूद जिल्हा माहिती, शिक्षण व संवाद निधीतून करण्यात यावी. प्रती ग्रामपंचायत अपेक्षित खर्चाचा तपशिल खाली दिला आहे.

२) ज्या ठिकाणी सदर प्रक्रिया तालूका संसाधन गटामार्फत प्रक्रियेचे सुलभीकरण होणार असेल अशा ठिकाणी खाली दिलेल्या रकाना क्रमांक ४ ते ६ पर्यंतच्या खर्चाची तरतूद करण्यात यावी.

३) ज्या ठिकाणी मुख्य संसाधन संस्था प्रक्रियेचे सुलभीकरण करणार असेल त्या ठिकाणी खाली दिलेल्या रकाना क्रमांक १ ते ६ पर्यंतच्या खर्चाची तरतूद करण्यात यावी.

### ३.१. प्रक्रियेसाठी आवश्यक असलेल्या खर्चाचे अंदाजपत्रक

| अ क्र | तपशिल | प्रति यूनीट खर्च रू | | | एकूण संख्या/ दिवस | | | एकूण रू. | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | युनीट | एकूण युनीट | प्रति युनीट रू. | | | | | |
| १ | सुलभकर्ता मानधन | सुलभकर्ता | २ | ५०० | x | ३ दिवस | = | ३,००० | मुख्य संसाधन संस्थेस काम दिल्यास |
| २ | सहाय्यक सुलभकर्ता मानधन | सुलभकर्ता | १ | ३०० | x | ३ दिवस | = | ९०० | |
| ३ | प्रवास खर्च | सुलभकर्ता | ३ | ५० | x | ३ दिवस | = | ४५० | |
| ४ | आहार भत्ता | सुलभकर्ता | ३ | १०० | x | ३ दिवस | = | ९०० | |

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ५ | एकदाच खरेदी करावयाचे साहित्य (यादीसह खर्चाचा तपशिल परिशिष्ट क्र.१ मध्ये दिला आहे.) | संख्या | १ | १,०५५ | x | १ संख्या | = | १,०५५ | |
| ६ | प्रत्येक नियोजन प्रक्रिये दरम्यान खरेदी करावयाचे साहित्य (यादीसह खर्चाचा तपशिल परिशिष्ट क्र.२ मध्ये दिला आहे | गाव | १ | ६९५ | x | ------ | = | ६९५ | |
| ७ | अहवाल निर्मिती व सादरीकरण | अहवाल | १ | ३००० | x | ------- | = | ३,००० | |
| | **एकूण** | | | | | | | **१०,०००** | |

## ३.२ प्रक्रियेसाठी आवश्यक असलेल्या साहित्याचा आणि त्यासाठीच्या खर्चाचा तपशिल

### अ. एकदाच खरेदी करावयाच्या साहीत्याची यादी - परिशिष्ट-१

| अ. क्र. | साहीत्याचा तपशिल | यूनीट | एकूण यूनीट | शेरा | प्रति युनीट दर रू | एकूण रू. |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | फोल्डर | संख्या | ०२ | - | ३० | ६० |
| २ | स्टॅपलर | संख्या | ०१ | - | ४० | ४० |
| ३ | प्लास्टीक चिमटे | डझन | ०३ | - | ३० | ९० |
| ४ | फूटपटटी | संख्या | ०४ | - | २० | ८० |
| ५ | कात्री | संख्या | ०१ | - | ३० | ३० |
| ६ | नायलॉन दोरी | संख्या | ०२ | प्रत्येकी २५ मी. प्रमाणे | २५० | ५०० |
| ७ | पिशवीबॅग/ | संख्या | ०१ | साहीत्य नेण्यासाठी | २५५ | २५५ |
| | **एकूण** | - | - | - | - | **१०५५** |

### ब. प्रत्येक नियोजन प्रक्रियेदरम्यान खरेदी करावयाच्या साहीत्याची यादी - परिशिष्ट-२

| अ.क्र. | साहीत्याचा तपशिल | यूनीट | एकूण यूनीट | शेरा | प्रति युनीट दर रू. | एकूण रू. |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | परमनंन्ट मार्कर (काळा,लाल,निळा,हिरवा) | संख्या | प्रत्येकी १ याप्रमाणे | ४- ५ मार्कर | २० | १०० |
| २ | स्केच पेन पाकीट | सेट | ०२ | - | २० | ४० |
| ३ | रंगीत चार्ट पेपर (पांढरा, गुलाबी, पिवळा, निळा) | संख्या | ३० | - | ०५ | १५० |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ४ | बोथ साईड टेप | संख्या | ०२ | मोठा असावा | ११० | २२० |
| ५ | खोड रबर | संख्या | ०४ | - | ०५ | २० |
| ६ | पेन | संख्या | ०४ | - | ०५ | २० |
| ७ | पेन्सील | संख्या | ०२ | - | ०५ | १० |
| ८ | फोल्डर | संख्या | ०२ | - | ३० | ६० |
| ९ | स्टॅपलर पीन्ज | पाकीट | ०१ | - | १५ | १५ |
| १० | A४ पांढरा कागद | संख्या | ४० | - | ०१ | ४० |
| ११ | फेवीस्टीक | संख्या | ०२ | - | १० | २० |
| १२ | कॅमेरा | संख्या | ०१ | - | - | - |
| | **एकूण** | | | **-** | **-** | **६९५** |

**४. प्रक्रियेच्या आयोजनासाठी जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्ष आणि पंचायत समितीची जबाबदारी -**

१. तालुक्यातील गावांमध्ये नियोजन प्रक्रियेच्या आयोजनसाठी आवश्यक प्रशासकीय मंजुरी, गावांना पत्राव्दारे कळविणे, प्रक्रियेपूर्वीची तयारी इ. बाबी पूर्ण करण्याची जबाबदारी जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षाची राहील. (गावपातळीवर प्रक्रियेपूर्वी करावयाच्या बाबी परिणामकारकरित्या पार पाडण्यासाठी मित्रा, नाशिक येथे आयोजित करण्यात आलेल्या प्रशिक्षणादरम्यान देण्यात आलेल्या प्रशिक्षण पुस्तिकेचा वापर करावा).

२. प्रक्रियेच्या आयोजनासाठी पत्र निर्गमित करणे तसेच प्रक्रियेदरम्यान गावपातळीवरील सर्व क्षेत्रीय कर्मचारी उदा. शिक्षक, आंगणवाडी सेविका, ग्रामसेवक, जलसुरक्षक इसरपंच., उपसरपंच, पाणी पुरवठा व स्वच्छता समितीचे सदस्य यांचा सहभाग प्राप्त होण्याच्यादृष्टीने जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षाने योग्य कार्यवाही करावी.

३. प्रक्रियेदरम्यानचे सनियंत्रण तसेच प्रक्रिया सुरळीत पार पडावी या हेतूने पंचायत समिती स्तरावर योग्य ती कार्यवाही करण्यात यावी. तसेच ग्रामसभेच्या दिवशी स्वत: गट विकास अधिकारी, सहाय्यक गट विकास अधिकारी यांनी उपस्थित राहून योग्य मार्गदर्शन करावे.

**५. प्रक्रियेचा अहवाल तयार करुन सादरीकरणाची प्रक्रिया -**

१. प्रक्रिया पूर्ण झाल्यांनतर प्रशिक्षण पुस्तिकेच्या परिशिष्टात दिलेल्या अहवाल नमुन्याच्या सहाय्याने ग्रामपंचायतीचा कृती आराखडा अहवाल तयार करण्यात यावा.

२. सदर अहवाल तयार करण्याची संपूर्ण जबाबदारी मुख्य संसाधन संस्था/ तालूका संसाधन गटाची राहील.

३. अहवाल तयार करण्यासाठी आवश्यक संसाधने उदा. संगणक, प्रिंटर इ. तालूका संसाधन गटास प्राधान्याने उपलब्ध करून देण्यात यावेत.

४. तयार झालेल्या कृती आराखडयासोबत स्वच्छता सुविधा कामांचे अंदाजपत्रक, ग्रामसभेच्या ठरावाची नक्कल, नमूना अहवालात दिलेली परिशिष्ट आणि प्रक्रियेदरम्यानची छायाचित्रे देणे बंधनकारक असेल.

५. सदर आराखडयाची एक प्रत पंचायत समितीस व एक प्रत ग्रामपंचायतीस सादर करण्यात यावी.

५.१नियोजन प्रक्रियेचा आढावा घेणे तसेच प्राप्त झालेल्या कृती आराखडयाचे एकत्रिकरण करून तो जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षास सादर करण्याची जबाबदारी पंचायत समितीची राहील.

५.२पाणी व स्वच्छता मिशन कक्षाने प्राप्त झालेल्या कृती आराखडयाच्या आधारावर जिल्हयाचा अहवाल तयार करून तो राज्यस्तरावरील पाणी स्वच्छता सहाय्य संस्था (WSSO) कक्षास सादर करावा. तसेच मासिक आढावा बैठकीत प्रक्रिया प्रगतीचा आढावा घ्यावा.

## ६. गाव कृती आराखडयाची अंमलबजावणी-

१. नियोजन प्रक्रियेव्दारे तयार झालेल्या कृती आराखडयाची प्रभावी अंमलबजावणी व्हावी यासाठी दरमहा तालूकास्तरावर बैठकीचे आयोजन करावे आणि गावाचा कृती आराखडा आणि अंदाजपत्रकानुसार गावस्तरावर झालेल्या कामाचा नियमित आढावा घेण्यात यावा.

२. आराखडयाची आणि अंदाजपत्रकाची प्रभावी अंमलबजावणी होत नसल्यास तालूकास्तरावर योग्य ती कार्यवाही करून आराखडयानुसार जास्तीत जास्त कामे पूर्ण होण्याच्या दृष्टीने आवश्यक ती कार्यवाही करावी.

३. जिल्हास्तरावर आयोजित करण्यात येणाऱ्या मासिक आढावा बैठकीत तालूकानिहाय कृती आराखडा अंमलबजावणीचा आढावा घेण्यात यावा.

४. आराखडयाच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने शासकीय योजनांचे समन्वयन करावे. ग्रामीण भागातील स्वच्छतेचा प्रश्न व्यापक असून तो सोडवताना लोकसहभागाचा आधार अत्यावश्यक असणार आहे. स्वच्छते संदर्भातील उपक्रम नियोजन, अंमलबजावणी आणि नंतरचा देखभाल दूरुस्तीचा टप्पा लोक सहभागाने सोपा करता येतो याचा पूर्वानुभव आपल्या जमेशी आहे. या पार्श्वभूमीवर स्वच्छता कार्यक्रमातील लोकसहभागाची भूमिका निश्चित करू शकणाऱ्या समुदाय संचलित हागणदारी निर्मूलन कृती आराखडा नियोजन प्रक्रियेचा स्वच्छ भारत मिशन अंमलबजावणीत समावेश करण्याचे सूचविण्यात येत आहे.

## ‘समूदाय संचलित हागणदारी निर्मूलन नियोजन प्रक्रिया’



सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०९१४३९१४०७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajesh Kumar

Digitally signed by Rajesh Kumar
DN: CN = Rajesh Kumar, C = IN, S = Maharashtra, O = ALL INDIA SERVICE, OU = IAS
Date: 2015.01.13 17:22:15 +05'30'

**(राजेश कुमार)**
प्रधान सचिव

प्रती,

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र शासन यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खासगी सचिव.
३. मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे खासगी सचिव.
५. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. जिल्हाधिकारी (सर्व)
७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
८. महासंचालक, आरोग्य महासंचालनालय, मुंबई.
९. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
१०. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, वासो (WSSO).
११. संचालय, नगरपालिका प्रशासन, वरळी, मुंबई.
१२. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
१३. विभागीय आयुक्त (सर्व).
१४. उपसचिव (सर्व),पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
१५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
१६. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
१७. प्रकल्प व्यवस्थापक, जलस्वराज्य- II, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (RSPMU),बेलापुर, नवी मुंबई.
१८. उपायुक्त (विकास) (सर्व) विभागीय आयुक्त यांचे कार्यालय
१९. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद (सर्व).
२०. उप प्रकल्प व्यवस्थापक (स्वच्छता), जिल्हा परिषद (सर्व).
२१. सर्व कार्यासने, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
२२. निवड नस्ती (पापु-०८).